सोनोग्राफी व तत्सम केद्रांच्या नोंदणीमुळे जमा
झालेल्या नोंदणी शुल्काच्या विनियोगाबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रचिनी -२०१२/प्र.क्र.१७२/कु.क.

१० वा मजला,बी विंग, गो.ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई - ०१
तारीखः ३० मे, २०१७

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः प्रचिनि-२००५/प्र.क्र.२२२/कु.क.२, दि.१९ ऑक्टोंबर,२००५**
२) **शासन निर्णय क्रमांकः प्रचिनि-२००७/६८४/प्र.क्र.१९७/कु.क.२, दि.११ जुलै,२००७**
३) **शासन निर्णय क्रमांकः प्रचिननि-२०१२/प्र.क्र.१७२/कु.क.२, दि.०६ ऑक्टोंबर,२०१२**

**शासन निर्णय-**

गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व निदान तंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) अधिनियम १९९४ सुधारीत २००३ नुसार गुणवंश सल्लागार केंद्र, गुणवंश प्रयोग शाहा, गुणवंश उपचार केंद्र व सोनोग्राफी केंद्र यांची नोंदणी करताना कायद्यानुसार नोंदणी शुल्क जमा होते. महानगरपालिका व जिल्हास्तरावर अशाप्रकारे जमा होणाऱ्या शुल्काच्या रकमेचा विनियोग केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार तसेच गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व निदानतंत्र ( लिंग निवडीस प्रतिबंध ) नियम १९९६ मधील नियम ५ (२) मधील तरतुदीनुसार कसा करावा याबाबत संदर्भ क्र. ३ अन्वये अदा करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार सविस्तर आदेश पारित करण्यात आलेले आहेत.

सदर शासन निर्णयात समुचित प्राधिकाऱ्याने करावयाच्या डिकॉय प्रकरणातील साक्षीदार, गर्भवती स्त्रीचे संरक्षण, न्यायालयातील प्रकरणात लागणाऱ्या विधी सल्ल्याची फी, सामाजिक लेखा-परिक्षण, समुचित प्राधिकारणाच्या व जिल्हा सल्लागार समितीच्या सभा, कार्यशाळा आयोजन, इंधन वंगण, कार्यालयीन खर्च छपाई, स्टीकर्स, वृत्तपत्र जाहीरात इत्यादी बाबीवर करण्यात यावयाच्या खर्चाच्या विनियोगाचा सुस्पष्ट उल्लेख आहे.

या कायद्यांतर्गत गुणवंश सल्लागार केंद्र, गुणवंश प्रयोग शाळा, गुणवंश उपचार केंद्र व सोनोग्राफी केंद्र यांची नोदंणी करताना नोंदणी शुल्क जमा होते. महानगरपालिका व जिल्हास्तरावर

दि. ३१.१२.२०१४ अखेर जमा झालेले आणि यापुढे जमा होणाऱ्या नोंदणी शुल्काच्या रक्कमेचा विनियोग केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार तसेच गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) नियम १९९६ मधील नियम  ५ (२)  मधील तरतुदीनुसार कायद्याची अंमलबजावणी करताना विविध बाबींसाठी खर्च करण्याकरिता खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

महानगरपालिका/जिल्हा तसेच राज्यस्तरावर खालील बाबींवर खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

**अ) <u>महानगरपालिका/जिल्हास्तरः -</u>**

१) प्रत्येक बनावट (डिकॉय केस) केसेससाठी डॉक्टर फी, लाभार्थी महिलासह त्याचे घरातील १ व्यक्ति व साक्षीदार यांना लागणारा खर्च रक्कम रुपये ५०,०००/- च्या मर्यादेत खर्च करावा.

२) न्यायालयीन प्रकरणामध्ये विधीविषयक सल्ला घेण्यासाठीची फी तसेच स्पेशल कौन्सिल यांची नियुक्ती करण्यासाठी करावयाचा खर्च.

३) सामाजिक लेखापरिक्षण करण्यासाठी येणारा खर्च (Social audit and analysis of documents / Reports).

४) महानगरपालिका/जिल्हा सल्लागार समिती व समुचित प्राधिकारण यांच्या सभा आयोजित करण्यासाठी येणारा खर्च.

५) वैद्यकीय अधिकारी, ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्र, हेल्थ पोस्ट नगरपालिका व इतर दवाखाने यांच्या सभा आयोजनासाठी येणारा खर्च.

६) कार्यशाळा आयोजनासाठी प्रत्येक कार्यशाळेकरीता रु.२०,०००/- च्या मर्यादेपर्यंत येणारा खर्च.

७) इंधन व वंगण- प्रत्येक  जिल्हा समुचित प्राधिकरण यांचे वाहनांसाठी प्रत्येकी प्रतिवर्षी रु. २०,०००/- च्या मर्यादेपर्यंत येणारा खर्च.

८) प्रतिवर्षी कार्यालयीन खर्च/न्यायालयीन प्रकरणे/स्टेशनरी/झेरॉक्स इत्यादी प्रत्येक जिल्हा/महानगरपालिका तसेच तालुका/ वॉर्ड समुचित प्राधिकारण यांचे स्तरावर रु. १२,०००/- च्या मर्यादेपर्यंत येणारा खर्च.

९) छपाई, हस्तपत्रिका, स्टीकर्स इत्यादि रु. २५,०००/- मर्यादेपर्यन्त प्रत्येक जिल्हा व महानगरपिलाक पातळीवरील समुचित प्राधिकरण यांचे स्तरांवर, रु. २५,०००/- मर्यादेपर्यंत तालुका व वॉर्ड समुचित प्राधिकार यांचे स्तरावर येणारा खर्च.

१०) टी.व्ही.केबल, वृत्तपत्र, जाहिरात रु.२५,०००/- मर्यादेपर्यंत जिल्हा व महानगरपालिका समुचित प्राधिकरण यांचे स्तरावर येणारा खर्च.

**<u>ब) राज्यस्तर</u> :-**

१) न्यायालयीन प्रकरणांमध्ये विधीविषयक सल्ला घेण्यासाठीची फी तसेच स्पेशल कौन्सिल यांची नियुक्ती करण्यासाठी करावयाचा खर्च.

२) सामाजिक लेखापरिक्षणासाठीचा येणारा खर्च (Social audit and analysis of documents/ Reports)

३) राज्य पर्यवेक्षकीय मंडळाची सभा आयोजनासाठीचा खर्च.

४) राज्य समुचित प्राधिकरण समितीची सभा आयोजनासाठी येणारा खर्च.

५) राज्य स्तरीय सल्लागार समितीची सभा आयोजनासाठी येणारा खर्च.

६) राज्य पर्यवेक्षकीय मंडळाचे अशासकिय सदस्यांना बैठकीसाठी येणे-जाणेचा प्रत्यक्ष झालेला प्रवास खर्च देणे.

७) तसेच राज्य सल्लागार समितीचे अशासकिय सदस्यांना बैठकीस उपस्थित राहणेसाठी येण्याजाण्याचा प्रत्यक्ष झालेला प्रवास खर्च देणे.

८) राज्य स्तरावर /विभागीय स्तरावर/जिल्हा/महानगरपलिका/तालुका वॉर्ड समुचित प्राधिकारण यांच्या बैठका/कार्यशाळा आयोजनासाठी येणारा खर्च.

९) केंद्र शासन/सर्वोच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या मार्गदर्शक सूचना आदेशाची छपाई व इतर प्रपत्र पुस्तिका इ. छपाईसाठी रु. २,५०,०००/- च्या मर्यादेपर्यंतचा खर्च.

१०) वृत्तपत्र, दूरदर्शनवर जाहिरात देण्यासाठी रु. १,००,०००/- पर्यंतचा खर्च.

११) टीन प्लेटस, प्लास्टिक डिस्प्ले बोर्ड तयार करण्यासाठी व महानगरपालिका/ नगरपालिका इमारत/जिल्हा परिषद इमारत/उद्याने, रुग्णालये/तहसिल कार्यालये/गट विकास अधिकारी कार्यालये व मोठया ग्रामपंचायती इ . ठिकाणी लावण्यासाठी रु. १,००,०००/- पर्यंतचा खर्च.

१२) जनजागृती फोल्डर, हॅण्डबिल्स, पुस्तिका, आवाहन पत्रे, रॅलीज मेळावे आयोजनासाठी रु. २,७०,०००/- पर्यंतचा खर्च.

१३) राज्यस्तरीय समुचित प्राधिकरणे व त्यांनी प्राधिकृत केलेल्य अधिकाऱ्यांना जिल्हा/तालुका स्तरावर भेटी देण्यासाठी वाहनाच्या इंधन खर्चासाठी रु. २,००,०००/- पर्यंतचा खर्च.

१४) कार्यालयीन खर्च, स्टेशनरी, झेरॉक्ससाठी रु.१,००,०००/- पर्यंतचा खर्च.

१५) सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालयीन प्रकरणी टायपिंग/झेरॉक्स इत्यादिसाठी रु. १,००,०००/- पर्यतचा खर्च.

महानगरपालिका, जिल्हास्तर व राज्यस्तरावर करण्यात येणारी सर्व खरेदी शासनाची विहित कार्यपध्दती अनुसरुन करण्यात यावी. राज्यस्तरावर खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेल्या उपरोक्त बाबींपैकी अनुक्रमांक ९,१०,११ व १२ येथील नमूद खर्च आयुक्त, (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या मान्यतेनंतर करण्यात यावा. उर्वरित बाबींवरील खर्च अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे यांच्या मान्यतेने करण्यात यावा.

या आदेशाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११२२१४२६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tulshiram Murlidhar Shinde

Digitally signed by Tulshiram Murlidhar Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b0114e3eb1e0ea81b74f3b5797e6c0f539d6318f719dfc9ee641eb1cc34c716, cn=Tulshiram Murlidhar Shinde
Date: 2017.05.30 12:19:17 +05'30'

**(तु.मु.शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, आरोग्य भवन. मुंबई
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा कुटुंब कल्याण, पुणे.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
६. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
७. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, (सर्व)
८. वैद्यकिय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय /उप जिल्हा रूग्णालये (सर्व)
९. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
११.महालखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१४.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५.निवडनस्ती (कु.क)